मानवसंपदा प्रणालीसाठी MS SQL Server Licenses खरेदी करण्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन आदेश क्रमांकः आयटी-२०१७/प्र.क्र.३३ (भाग-१) /मातंक

बांधकाम भवन,२५,मर्झबान पथ

फोर्ट,मुंबई-४००००१

तारीख: ०२ नोव्हेंबर,२०१९

**प्रस्तावना-**

या विभागाच्या दिनांक २३/०५/२०१९ रोजीच्या प्रकल्प अंमलबउ जावणी समितीच्या बैठकीमध्ये मानवसंपदा प्रणालीसाठी राबविण्यासाठी आवश्यक असणारे लॅपटॉप, Client PC,SQL Licenses with client, SMS charges, eSign, domain इ. बाबी विभागाने तातडीने खरेदी करून एनआयसीला उपलब्ध करून देण्याच्या प्रस्तावाला समितीने मान्यता दिली आहे. तसेच यासाठीचा खर्च ई-गव्हर्नन्समध्ये उपलब्ध तरतुदीतून भागविण्यासाठी विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीची मान्यता प्राप्त झाली आहे. सदर मान्यतेस अनुसरून MS SQL Server Licenses खरेदी करण्यासाठी निविदा प्रक्रियेचा अवलंब करण्यात येत आहे. त्यानुसार विभागास प्राप्त होणाऱ्या निविदांपैकी सर्वात कमी दर असणाऱ्या रामय्या टेक्नॉलॉजिज या निविदा धारक संस्थेकडुन (L1) MS SQL Server Licenses खरेदी करण्यासाठी येणाऱ्या रू.३३,००,०००/-(करासह) इतक्या खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन आदेश:-**

मानवसंपदा प्रणालीसाठी आवश्यक असणाऱ्या MS SQL Server Licenses ची रामय्या टेक्नॉलॉजिज यांचेकडून खरेदी करण्यासाठी येणाऱ्या रू. ३३,००,०००/- (रू. तेहतीस लक्ष) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. वरील खर्च "लेखाशिर्ष ३४५१-सेक्रेटरीएट-आर्थिक सेवा-(०१)(०३)- ई गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी १७ संगणक खर्च-(३४५१ २८०८) मागणी क्रमांक एल-४ (योजनांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशिर्षातंर्गत सन २०१९-२० मध्ये उपलब्ध झालेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन आदेश वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील भाग पहिला ,उप विभाग दोन, अनुक्रमांक २७-अ, नियम क्रमांक-७६ अन्वये विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११११६४८४३७४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NITIN MADHAVRAO PAWAR

Digitally signed by NITIN MADHAVRAO PAWAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a117e3cc0572a8ee7351e8f6fb49be5203b5f138252997c9865c8bf44d4e7d94, postalCode=400001, street=BANDHAKAM BHAVAN,MARZBAN PATH,FORT,MUMBAI, serialNumber=79d1142b510b75c1201d04efa5ba4e48e243bd2014663c505a44a97e90266500, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=NITIN MADHAVRAO PAWAR
Date: 2019.11.19 15:40:29 +05'30'

**(नितीन पवार)**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) महालेखापाल(लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
२) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
३) उप सचिव (वित्त ), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई
४) निवड नस्ती (का.माहिती तंत्रज्ञान कक्ष), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई